**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रकाशित करण्यात येणारे "लोकराज्य" (मराठी) मासिक खाजगी मुद्रणालयाकडून छपाई करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०२३/प्र.क्र.८५/मावज-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: - १७ मे, २०२४

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्रमांक: मावज-२०१९/प्र.क्र.६०/का.३४, दि.०४ जून, २०१९
२) शासन निर्णय क्रमांक: मावज-२०२०/प्र.क्र.६७/२०२०/का.३४,दि.८ जुलै, २०२२.
३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. प्रकाशने/२०२४-२५/का-३/लो.छपाई/१८५७, दि.१ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत "लोकराज्य" (मराठी) हे मासिक दरमहा प्रकाशित करण्यात येते. सदर मासिक हे शासनाचे ध्येय, धोरण व योजना जनतेपर्यंत पोहचविण्याचे प्रभावी माध्यम आहे. शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई मुद्रणालयात छपाई यंत्रणा अद्ययावत करण्यासाठी सदर यंत्राला लागणाऱ्या पायाभूत सुविधा पुरविण्याचे काम चालू आहे. तसेच, लोकराज्य (मराठी) या मासिकाची मुद्रणालयात छायाचित्रे उपलब्ध करुन देण्याची व्यवस्था नाही. आतील मजकुराकरीता न्यूज प्रिंट (जीएनपी) कागद उपलब्ध नाही. वितरणाकरीता रेल्वे एसटी पार्सलची व्यवस्था मुद्रणालयात उपलब्ध नाही.

सदर मासिक वर्गणीदारांना पाठविणे व वर्गणीदारांचे पत्ते स्टिकर तयार करणे ही व्यवस्था उपलब्ध नाही. मासिक वजनानुसार स्टिकर चिकटवण्यासाठी मशीन मुद्रणालयात उपलब्ध नाही. मासिक वर्गणीदारांना पोस्टाने पाठविण्यासाठी शंभर अंकाचे जिल्हावार गठ्ठे तयार करणे आणि मुंबई जी.पी.ओ.ने विहित केलेल्या तारखेमध्ये नेमून करुन देणे तसेच मासिके स्टॉलवर विक्री करण्यासाठी रेल्वे, एस.टी.पार्सलने पाठविणे वर्गणीदारांचे पत्ते आणि फेस स्टिकर चिकटवून देणे, पोस्टाने पाठविणे ही व्यवस्था मुद्रणालयात उपलब्ध नाही. तसेच सिनारमास आर्ट पेपर ९० जीएसएम व लॅमिनेशन व्यवस्था मुद्रणालयात उपलब्ध नसल्यामुळे सद्य:स्थितीत मराठी लोकराज्य मासिकाच्या ५००० प्रती खाजगी मुद्रणालयाकडून विहित शासन पध्दतीचा अवलंब करुन छपाई करुन घेण्यास शासन स्तरावर दिनांक ०१ एप्रिल, २०२४ ते ३१ मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई येथील छपाई यंत्रणा अद्ययावत होईपर्यंत लोकराज्य मासिक छपाई संबंधित विभागाच्या स्तरावर करण्याबाबत संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांनी अभिप्राय दिले आहेत. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने खाजगी मुद्रणालयामध्ये मराठी लोकराज्य मासिकाची छपाई करण्यासाठी सहमती दर्शविली आहे. त्यानुषंगाने दिनांक ०१ एप्रिल, २०२४ ते दिनांक ३१ मार्च, २०२५ या कालावधीसाठी मराठी लोकराज्य मासिकाची छपाई खाजगी मुद्रणालयातून करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

शासकीय मुद्रणालयात चार रंगी छपाई यंत्रणा उपलब्ध नसल्याने सदर यंत्रणा अद्ययावत होईपर्यंत माहे १ एप्रिल, २०२४ ते ३१,मार्च, २०२५ या एक वर्षाच्या कालावधीसाठी लोकराज्य

(मराठी) या मासिकाची छपाई ई-निविदा मागवून व विहित शासन कार्यपध्दतीचा अवलंब करुन खाजगी मुद्रणालयाकडून करुन घेण्यास शासनाची कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. लोकराज्य (मराठी) मासिक छपाईसाठी येणारा खर्च, सामान्य प्रशासन विभाग क्र. ए-६-२२२० माहिती य प्रसिद्धी- ०१. चित्रपट ००१, संचालन व प्रशासन, (००) (०१) प्रसिद्धी संचालक, १६ प्रकाशने संगणक संकेतांक (२२२०००४३) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ वर्षामध्ये मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार विहित कार्यपद्धतीचा अवलंब करून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१९/२०२४ (उद्योग-४) दिनांक १९ एप्रिल, २०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१७१५३७३४५५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.05.17 15:50:33 +05'30'

**( वि. मा. नांदेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१४. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. संचालक, (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६. संचालक, (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१७. उपसंचालक (वृत्त), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१९. सर्व विभागीय उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई, कोकण, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती, नागपूर
२०. सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
२१. उपसंचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८ स्टेट एम्पोरियम इमारत, बाबा खडकसिंग मार्ग, नवी दिल्ली- ११०००१
२२. वरिष्ठ सहाय्यक संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, श्री.काकुले यांची इमारत, दादा वैद्य रोड, पणजी, गोवा.
२३. निवडनस्ती(मावज-१),सामान्य प्रशासन विभाग.